# ग्राम गीता भाग 1 व 2

## E Book 22




## राष्ट्रीय संत श्री तुकडोजी महाराज विरचित

**ग्रामगीता ॲपवर मराठीतील पुर्ण गीता वाचायला क्लिक करा.**




मित्रहो,

**वंदनीय राष्ट्रीय संत श्री तुकडोजी महाराज विरचित युग परिवर्तन कार्य** एक **नामक** ग्रंथराज नुकतेच वाचनात आले. त्याचा परिचय करून द्यावा आणि ज्यांना आधीपासून या ग्रामगीतेची महती ज्ञात आहे, त्यांना पुनप्रत्ययाचा आनंद मिळावा ही इच्छा. अमरावतीच्या साहित्य रत्न सूदामजी सावरकरांच्या मार्गदर्शनाखाली कर्मयोगी संत श्री तुकाराम जी दादा गीताचार्य जन्मशताब्दीच्या निमित्ताने याचे विशेष संस्करण सन २०१४मध्ये प्रकाशित केले गेले.

**सुजन हो, दुमदुमवा कानोकानी, ही ग्रामगीतेची वाणी।**

**बाह्यांग –**

४१ अध्यायाच्या ३७५ पानाच्या या गीतेची रचना विदर्भातील राष्ट्रीय संत तुकडोजी महाराज यांनी ओवीच्या स्वरूपात आहे. आजकालच्या मराठी वाचकाला समजेल अशी सोपी व जवळची भाषा आहे. यात पाच अध्यायांचे एक असे आठ पंचक आहेत. शेवटचा अध्याय ग्रंथ महिमा आहे. व्यक्तिसमूहातून वाडी, खेडी, गाव आणि शहर बनते. यातून पुढे जिल्हे, राज्य आणि राष्ट्र बनते. या सर्वांच्या सामुहिक सहचरातून अनेक शक्ती, विचार आणि व्यवहार निर्माण होतात. प्राचीन काळपासून समाजधुरिणांनी याचा विचार करून जीवन पद्धती कशी असावी याची मांडणी केली. सामाजिक मापदंड, परंपरा, चालीरिती यातून ती मान्य होत गेली. त्यातून सामाजिक उन्नती झाली. मात्र काळानुसार मालिन्य आल्याने अनेक गोष्टींचा पुनर्विचार करून अनिष्ट व विघातक मांडणींना निरोप देऊन नव्याने समाजाला प्रेरणा द्यायला हवी असे अनेक विचारकांना वाटत राहिले. परंतु ते लेखनबद्ध करून समाजापुढे आचरणात आणायचे कार्य तुकडोजी महाराजांसारख्या लोकोत्तर व्यक्तीला करावे लागले. २२ जुलै १९५३ ला आषाढी एकादशीच्या चंद्रभागेच्या स्नानपर्वाच्या कलकलाटात तुकडोजींना ध्यानावस्थेत साक्षात्कार होऊन याकार्याला स्फूर्ती मिळाली. नंतर विविध ठिकाणी वास्तव्यात, तर कधी मोटार-अग्निरथाच्या प्रवासातून त्यांचे हे गीतानिर्मितीचे कार्य होत राहिले. आणि २८ मे १९५४च्या नारद जयंतीच्या दिवशी हा ग्रामगीता काव्याची निर्मिती संपन्न झाली सामान्यतःगीता म्हटले की जड शब्दात देव, आत्मा-परमात्मा, मोक्ष, जपतप, साधना आदि उपदेशाची घुट्टी पाजण्याची पाणपोई असे वाटून दुर्लक्ष केले जाते. नेमके ते सर्व या गीतेत नाही. मग हे काय असा प्रश्न

साहजिकच पडेल म्हणून हा परिचय उपयोगी व्हावा. याचा परिणाम म्हणजे काळाच्या पुढे राहून अंधश्रद्धा मुक्त, अनिष्ट रूढीमुक्त, तंटामुक्त, व्यसनमुक्त, भ्रष्टाचारमुक्त समाज बांधणीला सरकारकडून आणि अन्य समाजसेवी संस्थांकडून प्रचंड कार्य होत राहिले. तरीही अनेक विचारी व जाणीव रुंदावलेल्या तरुणांच्या नजरेत ही ग्रामगीता आली तर आपल्या आधीच्या पिढीने आपल्याला काय काय करायला प्रेरित केले आहे याची जाणीव व्हावी म्हणून हा

**ग्रंथ परिचय.**

सुरवातीच्या अध्यायात श्रोता व वक्ता यातील संवादातून ते म्हणतात,

**संतमहात्यांचे हद्गत। देवाचा शुभ सृष्टीसंकेत। विशद करावया सरळ भाषेत। सुखसंवाद आरंभिला।।**

**येथे श्रोती विचारले। ग्रामगीते प्रति लिहिणे झाले। त्यात संत देव कासया घातले। स्तुतिस्तोत्रे गौरवूनि?।।**

**... काय देव म्हणता काम नोहे?। संता न भजता वाया जाय?। आशीर्वाद न घेता येतो क्षय। सत्कार्यासि?। कासयासि मध्यस्थता। उगीच देव धर्माची कथा?। करावी सर्व आपण गाथा। मारावी माथा देवाच्या?।।....**

**यावर ते म्हणतात –**

**देव म्हणजे अतिमानव। मानवचा आदर्श गौरव। त्याचे कार्य ध्यानी राहो। स्फूर्ति यावया पुढिलांसि।।**

**येथे मुख्य देवाचे व्याख्यान। नाही केले यथार्थ पूर्ण। देवासि पुरुषोत्तम समजून। वागा म्हणालो सर्वांना।।**

**मित्रहो! गाव व्हावे स्वयंपूर्ण। सर्व प्रकारे आदर्शवान। म्हणोनि घेतले आशीर्वचन पूर्वजांचे।। ग्रामातील सर्वजन। होवोत सर्वसुखी संपन्न। घेऊ नये कुणाचा प्राण। समाजस्थिती टिकावी।।**

**आम्ही सर्वचि संतुष्ट राहू। सर्वमिळोनि स्व खाऊ। राबू सर्व, सुखे सेवू जे जे असेल ते सगळे।।**

**... आमची संपत्ति नसे आमची। आमचि संतति नसे आमची। कर्तव्यशक्तिही नसे आमची। व्यक्तिशःउपभोगार्थ।।**

**हे सारे गावाचे धन। असो काया वाचा बुद्धि प्राण। ऐसे असे जयाचे धोरण। तो नास्तिकही प्रिय आम्हा।।**

**लोकांपुढे विशाल ज्ञान। ठेवाया अत्युच्च आदर्श कोण?। म्हणोनि देवाचे नामाभिमान। घेतले विशाल भावाने।।...**

भाग 1 समाप्त... पुढे चालू...

.................

**ग्रामगीता**

विविध पंचक योजनाकरून गीतेचे विषयानुरूप **आठ विभाग** पाडले आहेत, ते असे -
**पहिल्या सद्धर्म पंचकात** देव, धर्म, आश्रम, संसार-परमार्थ आणि वर्णव्यवस्था यावर भाष्य आहे.
**दुसऱ्या लोक वशीकरण पंचकात** संसर्ग-प्रभाव, आचार-प्राबल्य, प्रचार-महिमा, सेवा सामर्थ्य, आणि संघटना-शक्ती याचा विचार केला आहे.
**तिसऱ्या ग्रामनिर्माण पंचकात** ग्रामरक्षण, ग्रामशुद्धी, ग्राम निर्माण कला, ग्राम-आरोग्य, गोवंश सुधार असे विचार मांडले आहेत.
**चौथ्या दष्टीपरिवर्तन पंचकात** वेष-वैभव, गरीबी-श्रीमंती, श्रम-संपत्ती, जीवनशिक्षण, महिलोन्नती असे विचार मांडले आहेत.
**पाचव्या संस्कार शोधन पंचकात** वैवाहिक जीवन, अंत्यसंस्कार, सणोत्सव, यात्रा-मेळे, देव-देवळे असा आहे.

**सहाव्या प्रेमधर्मस्थापन पंचकात** मूर्ती-उपासना, सामुदायिक प्रार्थना, प्रार्थना आणि विश्वधर्म, दलित-सेवा, भजन-प्रभाव असा आहे.
**सातव्या देवत्वसाधन पंचकात** संतचमत्कार, संतस्वरूप, अवतारकार्य, प्रारब्धवाद, प्रयत्नप्रभाव यावर विचार व्यक्त केले आहेत.
**आठव्या आदर्श जीवन पंचकात** जीवन-कला, आत्मानुभव, ग्राम-कुटुंब, भू-वैकुंठ, ग्रंथाध्ययन याचा विचार आहे. विचारकांनी हवे ते पंचक, हवा तो अध्याय शीर्षकाच्या किंवा या लिंकवर जाऊन वाचावा ही विनंती।
यानंतरच्या 41व्या अध्यायात ग्रंथाचा महिमा विषद आहे. तो असाःत्यात अन्य पोथ्या पुराणातील पारायण पद्धती, महती व फळ यावरील भाष्य बरेच काही सांगून जाते. काही उदाहरणार्थ... **ग्रंथ कसा वाचावा?**
**वाचतानाचि बोध होतो। अंगी स्फूरण भाव उठतो। कर्म करावयासि वळतो। जीव जैसे आंतरी।।...कोठे थांबावे वाचकांनी। कोठे वाचावे जोर देवोनि। कोठे रंगवावे गंभीरपणे। कळले पाहिजे वाचकां।। मुखाने ग्रंथ वाचावे। घरी विपरीत आचरावे। तैसेचि बाहेरि गोडवे गाति थट्टेने।।... येथे श्रोत्यांनी विचारिले। आपण अर्थासि, वर्तनासि महत्व दिले।। परि कित्येक ग्रंथी सांगितले। पारायणाची फलदायी।। कोणी म्हणती ग्रंथाचे पारायण। करिता मिळेल पुत्र, धन। होईल भाग्याचा उदय पूर्ण। पारायणे ग्रंथाच्या।। कोणी म्हणती ग्रंथ ज्या घरी। तेथे न ये काळाची फेरी।। याचा मेळ कोण्याप्रकारे बसेल सांगा?।। ग्रंथ प्रचार व्हावा म्हणून। दिले प्रलोभन दावूनि। त्यात एक आहे उत्तमही। लोक ठेविती ग्रंथ संग्रही।। नानाग्रंथ ऐसेचि वाचले। परि तैसे मुळीच नाही वर्तले। कोण्या तोंडाने मागावे भले। फळ तयासि?।। राही ग्रंथातहि अवास्तवता। हे न राहावे सांगितल्याविणा। त्यांनी श्रद्धेचा होतो धिंगाणा। फल न येता हाती।। लोकही असती आसक्त बावरे। काहिही सांगोत सांगणारे। धावोनि करती बिचारे। व्रत साधनेवेड्यापरि।। फळ न लाभता चिडति। म्हणति 'काय चाटावे ग्रंथांप्रति'?।। कलकत्त्याच्या गाडीत बसावे आणि म्हणे- 'देवा ! पंढरिसी न्यावे"। ऐशा प्रार्थनेसि फळ यावे। कोण्या प्रकारे?।।...**
**ग्रामगीता नव्हे पारायणासि। वाचता वाट दावी जनांसि। समूळ बदलवि जीवनासि। मनिं घेता अर्थ तिचा।। आपुला गाव आदर्श केला। ग्रामगीता वाचुनिया। ग्रामगीतेचे फळ नव्हे एकट्यासि। एका सहित आहे ग्रामासि।। मी पंडित नोहे आपुल्या ठाय़ी। सांगावया पंडिताई। ईश्वराचीच प्रेरणा ही। प्रकट झाली ग्रंथाद्वारे।। जो ग्रंथही वाचतो। नांगर धराया शेतातही जातो। वेळ पडल्या सेवा ही करतो। गाव लोकांची पाहिजे ती।। ऐसा असेल कोण्याहि जातिचा। धर्म पंथ देश विदेशीचा। तरी तो**

**चालेल । ग्रामोन्नतिचा जिव्हाळा जया ।। पंडित पुराणिक, विद्वान । यांनीही करावे अवश्य वाचन । समाजाचे जबाबदार म्हणोन । यथार्थ ज्ञान द्यावे सर्वां ।। ज्याचे हाती हा ग्रंथ पडला । अचानक मधुनि उघडला । वाचताचि समजावा उपदेश केला । ग्राम देवतेने मजलागी ।। उभा विश्वाचिया विटेवर । सद्गुरू विठ्ठल सर्वेश्वर! । त्याच्या कृपेचाचि विस्तार । तुकड्या म्हणे ग्रामगीता ।। इतिश्री ग्राम गीता ग्रंथ । गुरू-शास्त्र-स्वानुभव-संमत । लाभ घेवोत नित्य ग्रामस्थ । म्हणोनि अर्पिला विश्वरूपा ।।...**

।। समाप्त ।।



संत तुकडोजी महाराज हे संत गाडगे महाराज यांच्यासमावेत



**राष्ट्रसंत तुकडोजी महाराजांचा पोलादी पुतळा|गुरुकुंज मोझरी, अमरावती.**